**१ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई या कार्यालयास जहाजाची प्रतिमा बनविण्याच्या प्रशिक्षणाकरीता निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र :- राछासे-२६२३/प्र.क्र.२०३/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ मार्च, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०२३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.राछासे/अर्थ प्रशिबीरे/२०२३-२४/का-५/३१७०, दि. १८ सप्टेंबर, २०२३

**<u>प्रस्तावना :-</u>**

शिक्षण संस्थेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी सन १९४८-४९ मध्ये राष्ट्रीय छात्रसेना दलाची देशव्यापी स्वरुपात स्थापना करण्यात आली असून राष्ट्रीय छात्रसेनेची तरतूद व रचना करण्याच्या दृष्टीने "राष्ट्रीय छात्रसेना कायदा, १९४८" हा अधिनियम करण्यात आला आहे.

राज्यातील राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्रांकरीता प्रशिक्षण /शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येतात. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पिय तरतूदीमधून १ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई कार्यालयास जहाजाची प्रतिमा बनविण्याच्या प्रशिक्षणाकरीता एकूण रू. ७,६२,०७०/-( अक्षरी रूपये सात लक्ष, बासष्ठ हजार, सत्तर फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यातील राष्ट्रीय छात्र सेना कार्यालयांकडून राष्ट्रीय छात्रांकरीता प्रशिक्षण/ शिबिरांमार्फत विविध उपक्रम राबविण्यात येतात. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पिय तरतूदीमधून १ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई कार्यालयास जहाजाची प्रतिमा बनविण्याच्या प्रशिक्षणाकरीता एकूण रू. ७,६२,०७०/-( अक्षरी रूपये सात लक्ष, बासष्ठ हजार, सत्तर फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र. ४ परि. क्र. २७ (२)(ब) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च राष्ट्रीय छात्र सेना, मागणी क्रमांक- ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०२, (०१) विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्र सेना (अनिवार्य) २१, पुरवठा व

सामग्री (२२०४ ००१६) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ करीता उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. उक्त रक्कम कोषागारातून आहरित करणेकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबंधित समादेशक अधिकारी, १ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०५१६०१३५९८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2024.03.05 16:20:36 +05'30'

**( शैला ब. यादव )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना संचालनालय, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई (संचालनालयामार्फत)
६. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. समादेशक अधिकारी, १ महाराष्ट्र नाविक दल, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई
९. अवर सचिव (व्यय-५/ अर्थसंकल्प-८),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती, क्रीयुसे-३